**उप सचिव पदावरील पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालाचे विहित केलेले निकष बदलण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांकःईएसबी-११०१/प्र.क्र.३५/२००१/१३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः ५ ऑगस्ट, २००३

वाचाः१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःईएसबी-११९४/प्र.क्र.८४/९४/१३, दिनांक ७-९-९५.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःईएसबी-११००/प्र.क्र.१५(अ)/२०००/१३, दिनांक २२-१२-२०००.

## शासन निर्णय

मंत्रालयातील उप सचिव या पदावर पदोन्नतीसाठीचे गोपनीय अहवालाच्या प्रतवारीचे शासन निर्णय क्रमांक-ईएसबी-११००/प्र.क्र.१५(अ)/२०००/१३, दिनांक २२ डिसेंबर, २००० अन्वये "ब+" असे विहित केलेले निकष प्रस्तुत शासन निर्णयान्वये आता रद्द करण्यात येत आहेत.

२. पुनर्विचाराअंती उप सचिव पदावरील पदोन्नतीचे निकष "ब+" ऐवजी "अ" करण्याबाबत शासनाने पुनश्च निर्णय घेतला आहे. त्यामुळे संदर्भाधिन क्रमांक २ च्या आदेशान्वये रद्द केलेले क्रमांकःईएसबी-११९४/प्र.क्र.८४/९४/१३, दिनांक ७ सप्टेंबर, १९९५ चे आदेश आता पुनरुज्जीवित करण्यात येत असून ते पूर्वलक्षी प्रभावाने म्हणजे सन १९९७-९८ च्या निवडसूचीपासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(प्र. कृ. लोखंडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) मुख्य सचिवांचे स्वीय सहायक,
५) आस्थापना मंडळ क्रमांक २ चे अध्यक्ष व सर्व सदस्य
६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
७) सह/उप सचिव(आस्थापना), मंत्रालयातील सर्व विभाग,
८) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र. १४,
९) निवड नस्ती.

E:\Establishment BoardParipatrak